**शैक्षणिक वर्ष २०२३-२४**
**नवीन महाविद्यालयांना अंतिम**
**मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक :- मान्यता-२०२३/प्र.क्र.९५/मशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- १५ जून, २०२३.

<u>संदर्भ</u>:-१. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. मान्यता-२०२३/प्र.क्र.६३/मशि-४, दिनांक ०१.०४.२०२३
२. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. एनजीसी २०१७/(२९/१७)/मशि-४, दिनांक १५.०९.२०१७

**शासन आदेश :-**

शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून नवीन महाविद्यालय सुरु करण्यास महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ आणि संदर्भाधीन दिनांक १५.०९.२०१७ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या कार्यपद्धतीनुसार संदर्भ क्र.१ अन्वये इरादापत्र प्रदान करण्यात आले आहे.

आता, महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ (३) (च) अन्वये शैक्षणिक वर्ष २०२३-२४ साठी अकृषी विद्यापीठांनी नवीन महाविद्यालय सुरु करण्यास अंतिम मान्यता मिळण्याबाबतचे अनुपालन अहवाल सकारात्मक शिफारशीसह शासन मान्यतेसाठी शिफारशीत केले आहेत. संदर्भ क्र.२ येथील दिनांक १५.०९.२०१७ च्या शासन निर्णयामधील परिशिष्ट - "क" मध्ये विहित करण्यात आलेल्या निकषानुसार सदर प्रस्तावांची तपासणी करण्यात आली असून महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ (३) (छ) नुसार शासनास असलेल्या अधिकारांचा वापर करुन सोबतच्या विवरणपत्र-अ मध्ये नमूद केलेल्या एकूण ७३ नवीन महाविद्यालयांना शासनाने विहित केलेल्या खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून **कायम विना अनुदान तत्वावर** अंतिम मान्यता देण्यात येत आहे.

**२. अटी व शर्ती :-**

१. सदर महाविद्यालयाची मान्यता ही शासनाच्या प्रचलित धोरणानुसार कायम विनाअनुदानित तत्वावर राहील. तसेच सदर महाविद्यालयाच्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचा-यांचे वेतन व वेतनेतर दायित्व शासनावर असणार नाही.

२. नवीन महाविद्यालय/ संस्थेने त्यांच्या विभागीय सहसंचालकांकडे ते भविष्यात कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची मागणी करणार नाहीत असे हमीपत्र रु.१००/- च्या नॉन ज्युडीशियल स्टॅम्प पेपरवर सादर करावे.

३. महाविद्यालये/ संस्थेने हमीपत्र सादर केल्याशिवाय आणि तसे विभागीय सहसंचालकांचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय संबंधित विद्यापीठाने संलग्नतेची प्रक्रीया सुरु करु नये.

४. महाविद्यालयाने संबंधित विद्यापीठाने विहित केलेल्या निकषांनुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार अध्यापक / कर्मचारी वर्ग नेमणे आवश्यक असून, इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी उपलब्ध कराव्यात व त्याची खात्री विभागीय सहसंचालकांनी करावी आणि तद्‌नंतरच उपरोक्त अट क्र. २ मधील प्रमाणपत्र विद्यापीठास द्यावे.

५. महाविद्यालयाने कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत.

६. विद्यापीठ अनुदान आयोगाच्या (ऑफिलिएशन ऑफ कॉलेजस बाय युनिव्हर्सिटीज) रेग्युलेशन, २००९ मध्ये महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याबाबत विहित निकषांची पूर्तता केल्याशिवाय संबंधित महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याची कार्यवाही विद्यापीठाने करु नये.

७. मंजूर करण्यात आलेल्या महाविद्यालयाने सक्षम प्राधिकरणाने विहीत केलेल्या कालमर्यादेत नॅक मुल्यांकन करुन घेण्यासाठी प्रयत्न करावा व याबाबत पाठपुरावा करण्याची जबाबदारी संबंधित विद्यापीठाची राहील.

८. लिगल एज्युकेशन अधिनियम, २००८ व तद्‌नुषंगिक नियमांतील तरतूदीनुसार मान्यताप्राप्त नवीन महाविद्यालयाने बार कौन्सिल ऑफ इंडियाची (B.C.I.) प्रकरणपरत्वे मान्यता / संलग्निकरण घेण्याची कार्यवाही विहीत कालावधीत करावी.

९. ज्या शैक्षणिक वर्षासाठी महाविद्यालय सुरु करण्यास परवानगी देण्यात आलेली आहे, त्या शैक्षणिक वर्षात महाविद्यालय सुरु करणे आवश्यक आहे. संलग्निकरण किंवा इतर शिखर संस्था/ केंद्रीय नियामक मंडळे यांची परवानगी मिळण्यास विलंब झाल्यामुळे जर महाविद्यालय त्या शैक्षणिक वर्षात सुरु होऊ शकले नाही तर, त्या शैक्षणिक वर्षांच्या पुढील शैक्षणिक वर्षात महाविद्यालय सुरु करणे अनिवार्य राहील. अन्यथा दिलेली परवानगी आपोआप रद्द समजण्यात येईल.

३. संलग्नीकरण देण्याबाबत आवश्यक असलेली पुढील कार्यवाही करून विद्यापीठांनी संलग्नतेबाबतचा पुर्तता अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे व संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण यांना पाठवावा.

४. संबंधित विद्यापीठांनी व विभागीय सहसंचालकांनी मंजूर करण्यात आलेल्या नवीन महाविद्यालयांचा नियतकालिक आढावा घेऊन सदर महाविद्यालयांमध्ये मंजुर विद्यार्थी संख्येच्या ५०% किंवा त्यापेक्षा कमी विद्यार्थी दिसून आल्यास सदर महाविद्यालयांची मान्यता रद्द समजून तसे विभागीय सहसंचालकांनी आदेश काढावेत आणि ते शासन व संबंधित विद्यापीठाकडे पाठवावेत. मा. उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठ, नागपूर येथे दाखल झालेल्या याचिका क्रमांक २४४६/२०१३ व २४४८/२०१३ मध्ये उपस्थित केलेल्या बाबी विचारात घेता या अटी संदर्भात आवश्यक ती कार्यवाही करण्याची जबाबदारी सबंधित विद्यापीठ व विभागीय सहसंचालक यांची राहील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०६१५१५०६१११९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: CN = PRATAP PANDURANG LUBAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT
Date: 2023.06.15 23:29:12 +05'30'

**(प्रताप पां. लुबाळ)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (उ.व तं.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (उ.व तं.शि.वि.), मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त, राज्य सामायिक प्रवेश परीक्षा कक्ष, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे, महाराष्ट्र राज्य.
९. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. सर्व संबंधित विभागीय सहसंचालक, महाराष्ट्र राज्य.
११. निवडनस्ती (मशि-४).

## विवरणपत्र – अ

**शासन निर्णय क्रमांक :- मान्यता- २०२३/प्र.क्र. ९५/मशि-४, दिनांक १५ जून, २०२३ सोबतचे सहपत्र.**

| अ.क्र. | क्र. | संस्था/महाविद्यालयाचे नांव | विद्याशाखा/अभ्यासक्रम |
|---|---|---|---|
| | | **मुंबई विद्यापीठ, मुंबई.** | |
| १. | १. | झगडू सिंग चॅरिटेबल ट्रस्ट, ठाकुर हाउस, अशोक नगर, कांदिवली (पू), मुंबई-400101<br>ठाकुर स्पेशलाईज डिग्री कॉलेज, शिवाजी रोड ऑफ एम जी रोड, कांदिवली (पु), मुंबई-400067 | 1) बी. ए. (0-120)<br>2) बी. कॉम. (0-120)<br>3) बी. एस्सी. (0-120) |
| २. | २. | आर. एन. एज्यूकेशन सोसायटी आर.एन.नगर., आर. एन. रोड वाकणपाडा, नालासोपारा पूर्व, पालघर-४०१२०९<br>रेकॉन डिग्री कॉलेज ऑफ आर्टस ॲन्ड कॉमर्स, आर.एन.नगर., आर. एन. रोड वाकणपाडा, नालासोपारा पूर्व, पालघर-४०१२०९ | 1) बी. ए. (0-120)<br>2) बी. कॉम. (0-120) |
| ३. | ३. | चिमा पाटील शिक्षण संस्था<br>धानिवगाव, ता. वसई, जि पालघर-401208<br>ॲड कल्याणी पाटील लॉ कॉलेज, धानिवगाव, ता. वसई,जि पालघर-401208 | 1) विधी (3 वर्षे) (0-60) |
| ४. | ४. | हिरवळ एज्युकेशन ट्रस्ट, घर क्र. 1913, अनंत कॉम्प्लक्स, दुकान क्र ०2, एम.जी. रोड, पोस्ट महाड, ता. महाड, जि. रायगड-402301<br>हिरवळ विधी महाविद्यालय<br>मुंबई-गोवा महामार्गाजवळ, धारिया पेट्रोलपंपाच्या मागे, चांबारखिंड, पोस्ट व ता. महाड, जि. रायगड-402301 | 1) विधी (5 वर्षे) (0-60) |
| ५. | ५. | श्री राम पंडागळे एज्यूकेशन ट्रस्ट बंधुप्रेम सोसायटी, प्लॉट क्र. 728 डी 6 सेक्टर 7 चारकोप, कांदिवली (प.),मुंबई-400067<br>विद्याविकास डिग्री कॉलेज बांधण ता. विक्रमगड, जि. पालघर-401605 | 1) बी. कॉम. (0-120) |
| ६. | ६. | प्रियदर्शनी शैक्षणिक व सामाजिक विकास मंडळ जुनी एम. एच. बी. कॉलनी, गोराई रोड, बोरीवली (प), मुंबई- 400 091<br>सायली डिग्री कॉलेज सी. टी. एस. नंबर 240, जुनी एम. एच. बी. कॉलनी, गोराई रोड, बोरीवली (प), मुंबई- 400 091 | 1) बी. कॉम. (0-120)<br>2) बी. एस्सी (0-120) |
| ७. | ७. | पार्ले टिळक विद्यालय असोसिएशन हनुमान रोड, विर्लेपार्ले पू. मुंबई-400057<br>पी टि वि ए चे विधी महाविद्यालय गुजराज सोसायटी रोड, म. ल. डहाणुकर महाविद्यालय जवळ विर्लेपार्ले (पू.) मुंबई-400057 | 1) विधी 3 वर्षे (0-60) |

| अ.क्र. | क्र. | संस्था/महाविद्यालयाचे नांव | विद्याशाखा/अभ्यासक्रम |
|---|---|---|---|
| ८. | ८. | राष्ट्रीय शिक्षण संस्था राणाप्रताप भवन, पं.दिनदयाळ उपमार्ग, डोंबिवली प. ठाणे-421202<br>स्वामी विवेकानंद विधी महाविद्यालय<br>दत्त नगर, आयरे रोड, डोंबिवली पूर्व. ठाणे-421201 | 1) विधी (३ वर्षे) (0-60) |
| ९. | ९. | बाबु बलदेवसिंग मेमोरियल एज्यूकेशन ट्रस्ट, उल्हासनगर, शारत्री नगर, विठठलवाडी रेल्वे स्टेशन जवळ, उल्हासगन, जि. ठाणे-421 003<br>प्रेसिडेन्सी कॉलेज ऑफ लॉ,<br>1221-1224, शाश्री नगर, विठठलवाडी रेल्वे स्टेशन जवळ, उल्हासगन, जि. ठाणे-421 003 | 1) विधी (3 वर्षे) (0-60) |
| १०. | १०. | विद्यावर्धिनी कॅम्पस के टी रोड वसई रोड, (प.)पालघर-401202<br>विद्यावर्धिनीचे लॉ कॉलेज,<br>विद्यावर्धिनी कॅम्पस, के टी रोड, वसई रोड, वसई प. पालघर-401202. | 1) विधी (5 वर्षे) (0-60) |
| ११. | ११. | राजस्थान रिलीफ सोसायटी, रानी सती मार्ग, मालाड (पू), मुंबई- 400 097<br>बजाज डिग्री कॉलेज ऑफ आर्टस, कॉमर्स ॲन्ड सायन्स नवजीवन कॅम्पस, नवजीवन लेन, रानी सती मार्ग, मालाड (पू),<br>मुंबई- 400 097. | 1) बी. ए. (0-120)<br>2) बी. कॉम. (0-120)<br>3) बी. एस्सी. (0-120) |
| १२. | १२. | सेंट विल्फेड एज्यूकेशन सोसायटी, सेक्टर-10, मीरा मार्ग, मानसरोवर, जयपूर-302020<br>सेंट विल्फेड कॉलेज ऑफ आर्टस कॉमर्स ॲन्ड सायन्स<br>संघवी नगर, बीएमसी गार्डन जवळ, टीव्हीएस मेंट्रिक्स मोटर्सच्या मागे, मीरा भाईंदर रोड, मीरा रोड (पूर्व), ठाणे-401107 | 1) बी.ए. (0-120)<br>2) बी. कॉम. (0-120)<br>2) बी. एस्सी (0-120) |
| १३. | १३. | तेलगू समाज शिक्षण संस्था, 168 कणेरी, भिवंडी-421 305<br>पी. ई. एम. नाईट डिग्री कॉलेज,<br>फणेगाव, कामतघर, भिवंडी, जि ठाणे-421305 | 1) बी.ए. (0-120)<br>2) बी. कॉम. (0-120)<br>3) बी. एस्सी (0-120) |

| अ.क्र. | क्र. | संस्था/महाविद्यालयाचे नांव | विद्याशाखा/अभ्यासक्रम |
|---|---|---|---|
| १४. | १४. | कोकण मुस्लिम एज्यूकेशन सोसायटी ऑफ डिस्ट्रिक्ट ठाणे,रईस हायस्कुल कॅम्पस, ठाणे रोड, ता. भिवंडी, जि. ठाणे- 421 302<br>के. एम. ई. सोसायटीचे रात्र डिग्री कॉलेज ऑफ आर्टस आणि कॉमर्स रईस हायस्कुल कॅम्पस, ठाणे रोड, ता. भिवंडी, जि. ठाणे- 421 302 | 1) बी. ए. (0-120)<br>2) बी. कॉम. (0-120) |
| १५. | १५. | अंजूमन हिमायतुल इस्लाम, एस. टी. स्टँड समोर, महाड, जि. रायगड-402301<br>अंजूमन हिमायतुल इस्लाम सिनिअर कॉलेज, महाड, एस. टी. स्टँड समोर, महाड, जि. रायगड-402301. | 1) बी. ए. (0-120)<br>2)बी. कॉम (0-120)<br>3) बी.एस्सी (0-120) |
| १६. | १६. | खालापुर तालुका शिक्षण प्रसारक मंडळ, जुना मुंबई पुणे महामार्ग जवळ, खोपोली, जि. रायगड-410203<br>के.टी. एस. पी. एम चे विधी महाविद्यालय, जुना मुंबई पुणे महामार्ग जवळ, खोपोली, जि. रायगड-410203. | 1) विधी (3 वर्षे) (0-60) |
| | | **श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, चर्चगेट, मुंबई.** | |
| १७. | १. | दृष्टी बहुउद्देशीय संस्था,<br>श्री साई महिला महाविद्यालय, तिवसा, तालुका - तिवसा, जिल्हा - अमरावती | १. बॅचलर ऑफ डिझाईन (बी. डिझाईन) |
| १८. | २. | एकात्मिक अपंग विकास बहुउद्देशीय शिक्षण संस्था,<br>एमआरटी कॉलेज फॉर वुमेन्स, कॅम्प रोड, अमरावती तह आणि जिल्हा - अमरावती कॅम्प परिसर, अमरावती | १. बॅचलर ऑफ डिझाईन (बी. डिझाईन) |
| १९. | ३. | एकात्मिक अपंग विकास बहुउद्देशीय शिक्षण संस्था,<br>एमआरटी कॉलेज फॉर वुमेन्स, कॅम्प रोड, अमरावती तह आणि जिल्हा - अमरावती कॅम्प परिसर, अमरावती | **१.** बॅचलर ऑफ सायन्स (बी.एस्सी)<br>**२.** बॅचलर ऑफ सायन्स (होम सायन्स) |
| २०. | ४. | श्री स्वामी समर्थ महिला ग्रामीण विकास संस्था,<br>प्रियदर्शनी महिला महाविद्यालय, तालुका -मोर्शी, जिल्हा - अमरावती | बॅचलर ऑफ आर्टस (बी.ए)<br>बॅचलर ऑफ कॉमर्स (बी.कॉम)<br>बॅचलर ऑफ सायन्स (बी.एस्सी) |
| २१. | ५. | श्री स्वामी समर्थ महिला ग्रामीण विकास संस्था,<br>प्रियदर्शनी महिला महाविद्यालय, तालुका -मोर्शी, जिल्हा - अमरावती | बॅचलर ऑफ डिझाईन (बी. डिझाईन) |

| अ.क्र. | क्र. | संस्था/महाविद्यालयाचे नांव | विद्याशाखा/अभ्यासक्रम |
|---|---|---|---|
| २२. | ६. | दृष्टी सामाजिक सेवा संस्था,<br>विद्याविहार महिला महाविद्यालय, वरूड, तालुका-वरूड, जिल्हा - अमरावती | बॅचलर ऑफ डिझाईन (बी. डिझाईन) |
| २३. | ७. | दृष्टी सामाजिक सेवा संस्था,<br>विद्याविहार महिला महाविद्यालय, वरूड, तालुका-वरूड, जिल्हा - अमरावती | बॅचलर ऑफ आर्टस (बी.ए)<br>बॅचलर ऑफ कॉमर्स (बी.कॉम)<br>बॅचलर ऑफ सायन्स (बी.एस्सी |
| २४. | ८. | हजरत पिरपाशा कादरी बहुउद्देशीय विकास संस्था, राजमाता जिजाऊ वरिष्ठ महाविद्यालय, करमाड, तालुका व जिल्हा - औरंगाबाद | बॅचलर ऑफ आर्टस (बी.ए)<br>बॅचलर ऑफ कॉमर्स (बी.कॉम)<br>बॅचलर ऑफ सायन्स (बी.एस्सी) |
| २५. | ९. | श्री गंगाभारती बहुउद्देशीय सेवाभावी संस्था,<br>सावित्रीबाई फुले महिला महाविद्यालय, आष्टी, तालुका -परतुर, जिल्हा, जालना | बॅचलर ऑफ डिझाईन<br>(बी. डिझाईन) |
| २६. | १०. | श्री गंगाभारती बहुउद्देशीय सेवाभावी संस्था<br>शकुंतलाबाई महिला महाविद्यालय, आनंदवाडी, तालुका- परतुर, जिल्हा - जालना | बॅचलर ऑफ सायन्स (होम सायन्स) |
| २७. | ११. | श्री गंगाभारती बहुउद्देशीय सेवाभावी संस्था,<br>महात्मा फुले महिला महाविद्यालय, आष्टी, तालुका - परतुर, जिल्हा - जालना | बॅचलर ऑफ आर्टस (बी.ए)<br>बॅचलर ऑफ कॉमर्स (बी.कॉम)<br>बॅचलर ऑफ सायन्स (बी.एस्सी) |
| २८. | १२. | संजनु शिक्षण प्रसारक मंडळ<br>राजमाता अहिल्या कला वाणिज्य व विज्ञान महिला वरिष्ठ महाविद्यालय,<br>रोहिलागड, तालुका - अंबड, जिल्हा - जालना | बॅचलर ऑफ आर्टस (बी.ए)<br>बॅचलर ऑफ कॉमर्स (बी.कॉम)<br>बॅचलर ऑफ सायन्स (बी.एस्सी) |
| २९. | १३. | छत्रपती शाहू महाराज शिक्षण संस्था,<br>सरस्वती गर्ल्स कॉलेज, बोखारा, ता- नागपूर, जि-नागपूर | बॅचलर ऑफ डिझाईन (बी. डिझाईन)<br>बॅचलर ऑफ सायन्स (बी.एस्सी)<br>बॅचलर ऑफ सायन्स (होम सायन्स) |
| ३०. | १४. | श्री भगवान बाबा सेवाभावी संस्था,<br>भैरवनाथ महाविद्यालय, ताडसोन्ना, बीड | बॅचलर ऑफ आर्टस (बी.ए)<br>बॅचलर ऑफ सायन्स (बी.एस्सी) |
| ३१. | १५. | वी सेवन सोसायटी फॉर सोशन चेंज,<br>ए.टी पवार वुमेन्स कॉलेज, कनाशी,<br>तह कळवण जिल्हा - नाशिक | बॅचलर ऑफ डिझाईन (बी. डिझाईन) |
| ३२. | १६. | ताज फाउंडेशन,<br>राष्ट्रीय कला वाणिज्य विज्ञान महाविद्यालय, नागद, तालुका- कन्नड, जिल्हा - औरंगाबाद | बॅचलर ऑफ आर्टस (बी.ए)<br>बॅचलर ऑफ कॉमर्स (बी.कॉम)<br>बॅचलर ऑफ सायन्स (बी.एस्सी) |

| अ.क्र. | क्र. | संस्था/महाविद्यालयाचे नांव | विद्याशाखा/अभ्यासक्रम |
|---|---|---|---|
| ३३. | १७. | चतुराई प्रतिष्ठाण,<br>केंब्रिज महाविद्यालय, मु-पो चुंचा व्हाया, हादगाव ता-कळमनुरी, जि-हिंगोली | बॅचलर ऑफ डिझाईन (बी. डिझाईन) |
| ३४. | १८. | छत्रपती राजर्षी शाहू प्रतिष्ठाण,<br>राष्ट्रमाता जिजाऊ महिला महाविद्यालय, नांदेड रोड, वसमत ता- वसमत, जि- हिंगोली | बॅचलर ऑफ सायन्स (बी.एस्सी.) |
| ३५. | १९. | स्व. सुशीला काळे अल्पसंख्यांक बहुउद्देशीय शिक्षण संस्था,<br>भगवान महावीर महिला महाविद्यालय, सांजोळ, तालुका जाफ्राबाद, जिल्हा जालना | बॅचलर ऑफ आर्टस (बी.ए)<br>बॅचलर ऑफ कॉमर्स (बी.कॉम)<br>बॅचलर ऑफ सायन्स (बी.एस्सी) |
| ३६. | २०. | कै. तिलोकचंद कुचे शिक्षण प्रसारक मंडळ,<br>ग्रेस इन्स्टिटयूट ऑफ फॅशन डिझाईन, गट क्र. २०९, कृषी महाविद्यालयासमोर, बदनापूर, औरंगाबाद रोड, जालना | बॅचलर ऑफ डिझाईन (बी. डिझाईन) |
| ३७. | २१. | स्व. विष्णुपंत झोडगे बहुउद्देशीय विकास संस्था<br>कमल महिला महाविद्यालय, बोढाळा, नागपुर, तह आणि जिल्हा नागपुर | बॅचलर ऑफ डिझाईन (बी. डिझाईन) |
| ३८. | २२. | वी सेवन सोसायटी फॉर सोशन चेंज,<br>ए.टी पवार वुमेन्स कॉलेज, कनाशी,<br>तह कळवण, जिल्हा - नाशिक | बॅचलर ऑफ आर्टस (बी.ए)<br>बॅचलर ऑफ सायन्स (बी.एस्सी)<br>बॅचलर ऑफ सायन्स (बी.एस्सी. होम सायन्स) |
| ३९. | २३. | सम्यक प्रबोधन संघ,<br>प्रा. डॉ भगवान प्रधान महिला महाविद्यालय,<br>कांबरे, सापगाव, कांबरे पावर हाऊस जवळ,<br>तालुका - शहापूर, जिल्हा - ठाणे | बॅचलर ऑफ डिझाईन (बी. डिझाईन) |
| ४०. | २४. | स्व. विष्णुपंत झोडगे बहुउद्देशीय विकास संस्था<br>कमल महिला महाविद्यालय, बोढाळा, नागपुर, तह आणि जिल्हा नागपुर | **बॅचलर ऑफ कंम्प्युटर ॲपलिकेशन (बी.सी.ए)**<br>**बॅचलर ऑफ सायन्स (बी.एस्सी)** |
| ४१. | २५. | श्री. भैरवनाथ शिक्षण क्रिडा व समाजसेवा मंडळ<br>शिवछत्रपती महिला महाविद्यालय सुंदरवाडी, झालटा, ता. व जि. छत्रपती संभाजी नगर | बॅचलर ऑफ आर्टस (बी.ए)<br>बॅचलर ऑफ कॉमर्स (बी.कॉम)<br>बॅचलर ऑफ सायन्स (बी.एस्सी) |
| ४२. | २६. | हिंदू एज्युकेशन कल्चरल हेल्थ अँड वेलफेअर सोसायटी<br>मातोश्री वरिष्ठ महाविद्यालय, वृंदावन कॉलनी, कारेगाव रोड, तालुका व जिल्हा परभणी | **बॅचलर ऑफ आर्टस (बी.ए)** |
| | | **सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे** | |
| ४३. | १. | सरस्वती दर्शन फाऊंडेशन पत्ता: गंगा सॅटेलाईट वानवडी पुणे 411040 ता: हवेली जि:पुणे पिन : | सर्वसाधारण |

| अ.क्र. | क्र. | संस्था/महाविद्यालयाचे नांव | विद्याशाखा/अभ्यासक्रम |
|---|---|---|---|
| | | 412307<br>अर्हम कॉलेज ऑफ मॅनेजमेंट अँड इन्फॉर्मेशन टेक्नॉलॉजी पत्ता: मांजरी ता: पुणे (महानगर पालिका हद्द) जि:पुणे पिन : 412307 | वाणिज्य व व्यवस्थापन- बी. बी. ए. ( इंटरनॅशनल बिझनेस)<br>वाणिज्य व व्यवस्थापन- बी.बी.ए.(कॉम्प्युटर ॲपलिकेशन)-<br>विज्ञान व तंत्रज्ञान- बी.एस्सी. कॉम्प्युटर सायन्स |
| ४४. | २. | जयवंत शिक्षण प्रसारक मंडळ पत्ता: ताथवडे पुणे 410033 ता: मुळशी जि:पुणे पिन : 411041<br>छत्रपती शिवाजी कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय पत्ता: नऱ्हे ता: पुणे (महानगर पालिका हद्द) जि:पुणे पिन : 411041 | सर्वसाधारण<br>वाणिज्य व व्यवस्थापन- बी.कॉम.-<br>विज्ञान व तंत्रज्ञान- बी.एस्सी.<br>मानवविज्ञान- बी. ए. |
| ४५. | ३. | नवसह्याद्री चॅरीटेबल ट्रस्ट, पुणे पत्ता: 7 रामकुंज, आई. सी .एस. कॉलनी, गणेशखिंड रोड, पुणे 7 ता: हवेली जि:पुणे पिन : 411007<br>कै. निर्मलाताई पिंगळे विधी महाविद्यालय, चाकण पत्ता: चाकण ता: खेड जि:पुणे पिन : 410501 | सर्वसाधारण<br>मानवविज्ञान- बॅचलर ऑफ लॉ (एल एल.बी.) तीन वर्ष |
| ४६. | ४. | राजमाता जिजाऊ शिक्षण प्रसारक मंडळ पत्ता: लांडेवाडी भोसरी पुणे ता: पिंपरी चिंचवड मनापा हद्द जि:पुणे पिन : 412105<br>स्व आमदार लक्ष्मण जगताप विधी महाविद्यालय पत्ता: डुडुळगाव (भोसरी)(आळंदी रोड) ता: पिंपरी चिंचवड (महानगर पालिका हद्द) जि:पुणे पिन : 412105 | सर्वसाधारण<br>मानवविज्ञान- बॅचलर ऑफ लॉ (एल एल.बी.) तीन वर्ष |
| ४७. | ५. | मोहटा देवी सेवा प्रतिष्ठान पत्ता: मु पो .श्रीगोंदा ता.श्रीगोंदा जि.अहमदनगर ता: श्रीगोंदा जि:अहमदनगर पिन : 413701<br>सनराईज कॉलेज ऑफ फॅशन डिझाईनिंग पत्ता: श्रीगोंदा ता: श्रीगोंदा जि:अहमदनगर पिन : 413701 | सर्वसाधारण<br>विज्ञान व तंत्रज्ञान- बी.एस्सी. फॅशन डिजाईन |
| ४८. | ६. | मातोश्री फाऊंडेशन पाबळ पत्ता: मिळकत नंबर 2112 गाव पाबळ ता शिरूर जि पुणे 412403 ता: शिरूर जि:पुणे पिन : 412403<br>कै सावित्रीबाई ससाणे कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, महम्मदवाडी, हडपसर, पुणे पत्ता: महम्मदवाडी ता: पुणे (महानगर पालिका हद्द) जि:पुणे पिन : 411060 | सर्वसाधारण<br>वाणिज्य व व्यवस्थापन- बी.कॉम.<br>विज्ञान व तंत्रज्ञान- बी.एस्सी.<br>मानवविज्ञान- बी.ए. |
| ४९. | ७. | कर्वे समाजसेवा संस्था पत्ता: 18, हिल साईड, कर्वे नगर , पुणे 411052 ता: हवेली जि:पुणे पिन : 411052 | सर्वसाधारण<br>विज्ञान व तंत्रज्ञान- बी.एस्सी.(सायबर लायब्ररी सायन्स) |

| अ.क्र. | क्र. | संस्था/महाविद्यालयाचे नांव | विद्याशाखा/अभ्यासक्रम |
|---|---|---|---|
| | | बी. डी. कर्वे कॉलेज ऑफ आर्टस् ,कॉमर्स अँड सायन्स पत्ता: कोथरूड-कर्वे नगर ता: पुणे (महानगर पालिका हद्द) जि:पुणे पिन : 411052 | |
| ५०. | ८. | साकेश्वर ग्रामीण विकास सेवा संस्था पत्ता: घर न 48 करंदीकर हॉस्पिटल मागे वाघ मळा तालुका अ नगर जिल्हा अहमदनगर ता: अहमदनगर जि:अहमदनगर पिन : 414001<br>आडसूळ लॉ कॉलेज पत्ता: अहमदनगर ता: अहमदनगर जि:अहमदनगर पिन : 414005 | सर्वसाधारण<br>मानवविज्ञान- बॅचलर ऑफ लॉ (एल एल.बी.) तीन वर्ष |
| ५१. | ९. | त्रिमुर्ती शिक्षण प्रसारक मंडळ पत्ता: मु.पो. लोणीकंद, रामनगर, ता. हवेली, जि.पुणे ता: हवेली जि:पुणे पिन : 412216<br>शिल्पकार लॉ कॉलेज पत्ता: लोणीकंद ता: हवेली(महानगर पालिका हद्द वगळून) जि:पुणे पिन : 412216 | सर्वसाधारण<br>मानवविज्ञान- बॅचलर ऑफ लॉ (एल एल.बी.) तीन वर्ष |
| ५२. | १०. | श्री. बबनराव नारायण ढोकळे शिक्षण व संशोधन संस्थ्या पत्ता: स नं 215 ऐ 3 नंदनवन कॉलनी गराडे गिरणी पाठीमागे पाण्याच्या टाकीजवळ संत तुकारामनगर भोसरी पुणे 414039 ता: पारनेर जि:अहमदनगर पिन : 414304<br>आदर्श महाविद्यालय पत्ता: खडकवाडी ता: पारनेर जि:अहमदनगर पिन : 414304 | सर्वसाधारण<br>वाणिज्य व व्यवस्थापन- बी.कॉम.<br>विज्ञान व तंत्रज्ञान- बी.एस्सी.<br>मानवविज्ञान- बी. ए. |
| ५३. | ११. | श्री संत सेवालाल महाराज सेवाभावी संस्था पत्ता: वसंतनगर पो. जातेगाव ता. नांदगाव जि. नाशिक ता: नांदगाव जि:नाशिक पिन : 423106<br>पिनाकेश्वर कला वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय पत्ता: वसंत नगर जातेगाव ता: नांदगाव जि:नाशिक पिन : 423106 | सर्वसाधारण<br>वाणिज्य व व्यवस्थापन- बी.कॉम.<br>विज्ञान व तंत्रज्ञान- बी.एस्सी.<br>मानवविज्ञान- बी. ए. |
| ५४. | १२. | सौ. कौशल्याबाई रघुनाथ आगळे बहुउद्देशीय प्रतिष्ठान पत्ता: गट नं. 86/3/ब , 86/2/ब , नेवासा फाटा, मु. पोस्ट. मुकिंदपूर, ता. नेवासा, जिल्हा अहमदनगर ता: नेवासा जि:अहमदनगर पिन : 414603 | सर्वसाधारण<br>मानवविज्ञान- बॅचलर ऑफ लॉ (एल एल.बी.) तीन वर्ष |

| अ.क्र. | क्र. | संस्था/महाविद्यालयाचे नांव | विद्याशाखा/अभ्यासक्रम |
|---|---|---|---|
| | | सौ. कौशल्याबाई रघुनाथ आगळे विधी महाविद्यालय, नेवासा फाटा पत्ता: खडके नेवसा फाटा ता: नेवासा जि:अहमदनगर पिन : 414603 | |
| | | **शिवाजी विद्यापीठ कोल्हापूर, कोल्हापूर** | |
| ५५. | १ | दि फ्रेंडस् असोसिएशन, जत, ता.जत, जि.सांगली संचलित कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, कुंभारी, ता.जत, जि.सांगली. | कला<br>वाणिज्य<br>विज्ञान |
| ५६. | २ | आनंदी शिक्षण प्रसारक मंडळ, कळंबे तर्फ कळे, ता. करवीर, जि.कोल्हापूर संचलित आनंदी विधी महाविद्यालय, कळंबे तर्फ कळे, ता.करवीर, जि.कोल्हापूर | विधी – ३ वर्षे<br>विधी – ५ वर्षे |
| ५७. | ३ | श्री स्वामी विवेकानंद शिक्षण संस्था, कोल्हापूर संचलित दत्ताजीराव कदम लॉ कॉलेज, इचलकरंजी, ता.हातकणंगले, जि.कोल्हापूर | विधी – ३ वर्षे<br>विधी – ५ वर्षे |
| | | **कवयित्री बहिणाबाई चौधरी उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव** | |
| ५८. | १ | श्री संत दामाजी अप्पा चॅरीटेबल ट्रस्ट, आरखेड आरखेड, ता. पालम, जि. परभणी-४३१७२० सातपुडा वरिष्ठ महाविद्यालय, जमाना ता.अक्कलकुवा जि. नंदुरबार – ४२५४१५ | बी.ए.<br>बी.एस्सी. |
| | | **संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती** | |
| ५९. | १. | लोकहित शिक्षण प्रसारक मंडळ, पातुर, ता. पातुर, जि. अकोला. सैय्यद मोहसीन आर्टस्, कॉमर्स अॅन्ड सायन्स सिनिअर कॉलेज, पातुर, ता. पातुर, जि.अकोला. | कला<br>(मानव विज्ञान विद्याशाखा)<br>विज्ञान<br>(विज्ञान व तंत्रज्ञान विद्याशाखा)<br>वाणिज्य<br>(वाणिज्य व व्यवस्थापन विद्याशाखा) |
| ६०. | २. | वसुंधरा बहुउद्देशिय सामाजिक संस्कार ज्ञानपीठ, आदर्श नगर, खामगांव, ता. खामगांव, जि. बुलढाणा. सिध्दीविनायक कॉलेज ऑफ सायन्स, कॉमर्स अॅन्ड आर्टस्, शिरजगांव निळे, खामगांव रोड, ता. शेगांव, जि. बुलढाणा. | कला<br>(मानव विज्ञान विद्याशाखा)<br>वाणिज्य<br>(वाणिज्य व व्यवस्थापन विद्याशाखा)<br>विज्ञान<br>(विज्ञान व तंत्रज्ञान विद्याशाखा) |
| ६१. | ३. | वसुंधरा बहुउद्देशिय सामाजिक संस्कार ज्ञानपीठ, आदर्श नगर, खामगांव, ता. खामगांव, जि.बुलढाणा. स्वामी विवेकानंद कॉलेज ऑफ सायन्स, कॉमर्स अॅन्ड आर्टस्, आदर्श नगर, ता.खामगांव, जि.बुलडाणा. | विज्ञान<br>(विज्ञान व तंत्रज्ञान विद्याशाखा)<br>कला<br>(मानव विज्ञान विद्याशाखा)<br>वाणिज्य<br>(वाणिज्य व व्यवस्थापन विद्याशाखा) |

| अ.क्र. | क्र. | संस्था/महाविद्यालयाचे नांव | विद्याशाखा/अभ्यासक्रम |
|---|---|---|---|
| ६२. | ४. | सेवालाल महाराज सांस्कृतिक व क्रिडा संस्था, महाळुंगी, ता.आर्णी, जि.यवतमाळ.<br>सुश्री संत यशोदाबाई पवार कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, लोणबेहळ, ता. आर्णी, जि.यवतमाळ. | कला<br>(मानव विज्ञान विद्याशाखा)<br>वाणिज्य<br>(वाणिज्य व व्यवस्थापन विद्याशाखा)<br>विज्ञान<br>(विज्ञान व तंत्रज्ञान विद्याशाखा) |
| ६३. | ५. | रहिम अली खान सौदागर मल्टीपर्पज ॲन्ड एज्युकेशन सोसायटी, चिखली, ता. चिखली, जि. बुलढाणा.<br>करम विधी महाविद्यालय, जुने बुलढाणा रोड, मालगणी शिवार, चिखली, ता. चिखली, जि.बुलढाणा. | विधी<br>(मानव विज्ञान विद्याशाखा)<br>५ वर्षीय विधी<br>३ वर्षीय विधी |
| ६४. | ६. | श्रीराम बहुउद्देशिय सोसायटी, बुलढाणा, द्वारा: श्रीराम ऑफसेट, लोणार. ता. लोणार, जि.बुलढाणा.<br>मापारी महाविद्यालय, गायखेड, ता. लोणार, जि.बुलढाणा. | कला(मानव विज्ञान विद्याशाखा)<br>वाणिज्य(वाणिज्य व व्यवस्थापन विद्याशाखा)<br>विज्ञान(विज्ञान व तंत्रज्ञान विद्याशाखा) |
| ६५. | ७. | मायनॉरीटी एज्युकेशन सोसायटी, प्लट नं. ६, शादाब बाग, भोसा रोड, यवतमाळ, ता.जि.यवतमाळ.<br>आदर्श कला, विज्ञान व वाणिज्य कॉलेज, (महिला) यवतमाळ, ता. जि.यवतमाळ. | कला(मानव विज्ञान विद्याशाखा)<br>विज्ञान(विज्ञान व तंत्रज्ञान विद्याशाखा)<br>वाणिज्य(वाणिज्य व व्यवस्थापन विद्याशाखा)<br>(महिला महाविद्यालय) |
| ६६. | ८. | शिवाई एज्युकेशनल सोशल ॲन्ड मेडिकल ट्रस्ट, २९, शिक्षक कॉलनी, अमरावती, ता. जि. अमरावती.<br>भारतरत्न डॉक्टर ए.पी.जे. अब्दुल कलाम कॉलेज फॉर युजी ॲन्ड पीजी कोर्सेस विथ मिलेनियम स्किल्स इनोव्हेशन इंक्युबॅशन ॲन्ड रिसर्च, अमरावती, ता. जि. अमरावती. | कला<br>(मानव विज्ञान विद्याशाखा)<br>विज्ञान<br>(विज्ञान व तंत्रज्ञान विद्याशाखा)<br>वाणिज्य<br>(वाणिज्य व व्यवस्थापन विद्याशाखा)<br>(रात्रकालीन महाविद्यालय) |
| | | **राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर, विद्यापीठ** | |
| ६७. | १. | मुक्तांगण शिक्षण अभ्यास संस्था, भंडारा श्रीराम फटे महाविद्यालय, मु. पो. पोहरा, ता. लाखणी, जि. भंडारा — ४४१ ८०९. | १. बी.ए. (२ भाषा व ४ ऐच्छिक विषय) मराठी माध्यम<br>२. बी.एस्सी (२ भाषा व ५ ऐच्छिक विषय) इंग्रजी माध्यम |
| ६८. | २. | मुक्तांगण शिक्षण अभ्यास संस्था, भंडारा नामदेवराव दिवटे महाविद्यालय, मु. डोकेसरांडी, पो. ओपारा ता. लाखांदूर, जि. भंडारा — ४४१ ८०३. | १. बी.ए. (२ भाषा व ४ ऐच्छिक विषय) मराठी माध्यम<br>२.बी.एस्सी (२ भाषा व ५ ऐच्छिक विषय) इंग्रजी माध्यम |

| अ.क्र. | क्र. | संस्था/महाविद्यालयाचे नांव | विद्याशाखा/अभ्यासक्रम |
|---|---|---|---|
| ६९. | ३. | महात्मा ज्योतिबा फुले शिक्षण संस्था, सुर्यटोला, गोंदिया एस.आर. महिला महाविद्यालय, गोरेगांव, ता. गोरेगाव, जि. गोंदिया – ४४१ ६०१. | १. बी.ए. (२ भाषा व ४ ऐच्छिक विषय) मराठी माध्यम<br>२. बी.कॉम (अभ्यासक्रमाप्रमाणे) इंग्रजी माध्यम<br>३. बी.एस्सी. (२ भाषा व ५ ऐच्छिक विषय) इंग्रजी माध्यम |
| ७०. | ४. | श्री. पारवे बहुउद्देशीय एज्युकेशन सोसायटी, भिवापूर पारवे आर्टस, कॉमर्स अ‍ॅन्ड सायन्स कॉलेज, वार्ड क्र. १, भिवापूर, ता. भिवापूर, जि. नागपूर – ४४१ २०१. | १. बी.ए. (२ भाषा व ४ ऐच्छिक विषय) मराठी माध्यम<br>२. बी.कॉम (अभ्यासक्रमाप्रमाणे) मराठी माध्यम<br>३. बी.एस्सी (२ भाषा व ५ ऐच्छिक विषय)<br>इंग्रजी माध्यम |
| ७१. | ५. | लेट. खुशाल कापसे बहुउद्देशीय शिक्षण संस्था, गोंदिया लेट. नानकुबाई खुशाल कापसे आर्टस, सायंन्स अ‍ॅन्ड कॉमर्स नाईट कॉलेज, गोंदिया तह आणी ता. गोंदिया, जि. गोंदिया – ४४१ ६०१. | १. बी.ए. (२ भाषा व ४ ऐच्छिक विषय) मराठी माध्यम<br>२. बी.कॉम (अभ्यासक्रमाप्रमाणे) इंग्रजी माध्यम<br>३. बी.एस्सी (२ भाषा व ५ ऐच्छिक विषय)<br>इंग्रजी माध्यम |
| ७२. | ६. | श्याम बहुउद्देशीय शिक्षण संस्था, साकोली श्यामराव पाटील कापगते महाविद्यालय, मु. पो. लाखांदूर, ता. लाखांदूर, जि. भंडारा – ४४१ ८०३. | १. बी.ए. (२ भाषा व ४ ऐच्छिक विषय) मराठी माध्यम<br>२.<br>बी. बी.एस्सी (२ भाषा व ५ ऐच्छिक विषय)<br>इंग्रजी माध्यम |
| | | **गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली** | |
| ७३. | १. | समिधा सेवा संस्था नागभिड, जि. चंद्रपूर सरस्वती जैरामजी तर्वेकर महिला महाविद्यालय, नागभिड, जि. चंद्रपूर | **कला, वाणिज्य व विज्ञान** |

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: CN = PRATAP PANDURANG LUBAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT
Date: 2023.06.15 23:29:26 +05'30'

**(प्रताप पां. लुबाळ)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**